# शालेय प्रकल्पासाठी उपयुक्त

पुरेपूर माहिती व भरपूर छायाचित्रांसह

प्रकल्पातून ओळख

# महाराष्ट्रातील नदया

३०

संपादक - प्रा. अनंत वाईकर

एम. ए. (इति.), एम.ए. (राज्य), एम. ए. (समाज), बी.एड्., डी. एड्.



सरस्वती बुक कंपनी, पुणे २.

# प्रकल्पातून ओळख

# महाराष्ट्रातील नद्या




◆ संपादक ◆

**प्रा. अनंत वासुदेव वाईकर**

एम. ए. (इति.), एम.ए. (राज्य), एम. ए. (समाज), बी.एड्., डी. एड्.

हरिभाई देवकरण कनिष्ठ महाविद्यालय, सोलापूर

◆ लेखक ◆

**श्री. संजय शंकर देशपांडे**

एम. एस्सी. बी.एड्.

वसंतराव देशमुख विद्यालय विकास प्रशाला, सोलापूर


किंमत ₹ २५


**सरस्वती बुक कंपनी**

अथर्वश्री बिल्डिंग, १२१ बुधवार पेठ, जोगेश्वरी मंदिरासमोर (पूर्व), श्रीमंत दगडूशेठ गणपती मंदिरामागे, पुणे-२.
फोन : २४४५१२१९/२४४७६८०९/२४४५४०८६

# अनुक्रमणिका INDEX




**Publisher & Printer :** *Yogesh Ramesh Kundur*
**Adarsh Vidyarthi Prakashan**
'Atharvashree' 129, Budhawar Peth, Opp. Jogeshwari Mandir, Behind Dagadusheth Ganpati Mandir, Pune-2 ☎ 24451219 / 24454086 / 24476809
**Edition :2011**




**Printing Section :** 26/A, Narhe-Dhayari Road, Near Pari Company, Pune- 41. ☎ 32946933

**Main Book Sellers**

- **Saraswati Book Company**
  'Atharvashree' 129, Budhawar Peth, Opp. Jogeshwari Mandir, Behind Dagadusheth Ganpati Mandir, Pune - 2
  ☎ 24451219 Fax : 24454086 / 32946934,35
- **Saraswati Book Depot**
  18, Navi Peth, Solapur - 7
  ☎ 2626630
- **Kundur Bandhu Pustak Bhandar**
  63, Navi Peth, Solapur -7
  ☎ 2626156

# 1. भीमा Bhima



पंढरपूर

**महाराष्ट्रातील** काही प्रमुख नद्यांमध्ये भीमा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** भीमा नदीचा उगम सह्याद्री पर्वतातील भीमाशंकर येथे होतो. भीमाशंकर हे पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यामध्ये आहे.

**भीमा नदीच्या उपनद्या :** मुळा, मुठा, इंद्रायणी, माण, घोड, सीना आणि नीरा या भीमानदीच्या उपनद्या आहेत. या नद्या भीमा नदीला येऊन मिळतात.

**भीमा नदीचे खोरे :** भीमा नदीच्या खोऱ्यामध्ये पुणे, सातारा, अहमदनगर, सोलापूर इत्यादी जिल्हे येतात.

**इतर माहिती :** भीमानदी भीमाशंकर येथे उगम पावल्यावर ती पुढे सपाट प्रदेशातून वाहत येते. ही नदी पूर्ववाहिनी आहे. दक्षिणेकडील

महादेवाचे डोंगर व उत्तरेकडील बालाघाटाचे डोंगर यांच्यामधील प्रदेश हा भीमा नदीच्या खोऱ्याचा प्रदेश आहे. भीमा नदीला विविध उपनद्या येऊन मिळतात; त्यामुळे तिचे पात्र बरेच रुंद झाले आहे.

भीमा नदीला इंद्रायणी नदी तुळापूरजवळ, तर मुळा व मुठा या नद्या रांजणगावाजवळ येऊन मिळतात. यानंतर भीमा नदी पुणे जिल्ह्याच्या सीमेवरून वाहत जाते. पुढे नरसिंहपूर येथे नीरा नदी भीमेला येऊन मिळते. या ठिकाणाला नीरानरसिंहपूर असे म्हणतात. नीरानरसिंहपूर हे एक तीर्थक्षेत्र आहे. पुढे भीमा नदी पंढरपूर येथे येते. पंढरपूरजवळ तिचे पात्र चंद्राच्या कोरीसारखे बनते म्हणून तिला 'चंद्रभागा' असेही म्हणतात. या चंद्रभागेच्या तीरावर पंढरपूर येथे पांडुरंगाचे प्रसिद्ध मंदिर आहे. पंढरपूर हे तीर्थक्षेत्र संपूर्ण भारतात प्रसिद्ध आहे.

भीमा नदीवर उजनी येथे मोठे धरण बांधले आहे. या धरणातून कालवे काढून शेतीसाठी पाणीपुरवठा केला जातो; तसेच सोलापूर जिल्ह्यातील लोकांना पिण्याच्या पाण्याचा पुरवठा केला जातो. बरेच पाणी उद्योगधंद्यांनासुद्धा पुरवले जाते.

भीमा नदीमुळे तिच्या आसपासचा प्रदेश सुपीक बनला आहे. त्यामुळे भीमा नदी एक वरदायिनी ठरलेली आहे.



## 2. पंचगंगा Panchganga



**महाराष्ट्रातील** काही प्रमुख नद्यांमध्ये पंचगंगा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** कुंभी, कासारी, तुळशी, भोगावती आणि सरस्वती या पाच नद्या एकत्र येऊन पंचगंगा नदी बनली आहे, असे म्हणतात.

**पंचगंगा नदीच्या उपनद्या :** गोमती, कोरोची, जयंती या पंचगंगा नदीच्या उपनद्या आहेत. या नद्या पंचगंगा नदीला येऊन मिळतात.

**पंचगंगा नदीचे खोरे :** पंचगंगा नदीच्या खोऱ्यात कोल्हापूर जिल्ह्याचा बराचसा भाग येतो.

**इतर माहिती :** पंचगंगा नदी ही कोल्हापूर जिल्ह्यातून वाहणारी एक प्रमुख नदी आहे. हिची लांबी साधारणपणे ८० किमी. असून ही नदी पूर्ववाहिनी आहे. ही नदी पन्हाळा, करवीर, हातकणंगले तसेच शिरोळ तालुक्यातून वाहत जाते.

नरसोबाची वाडी येथे ही पंचगंगा नदी कृष्णा नदीला येऊन मिळते. या पवित्र संगमाच्या ठिकाणी प्रसिद्ध दत्त मंदिर आहे. या नदीचे खोरे साधारणपणे ६५० चौ. कि. मी. परिसराचे आहे.

पंचगंगा या नदीजवळ कोल्हापूर हे शहर वसले आहे. या शहरात महालक्ष्मीचे प्रसिद्ध मंदिर आहे.

पंचगंगा नदीच्या पात्रामुळे आसपासचा प्रदेश बराच सुपीक बनला आहे. या भागातील लोकांचे जीवन सुखी करण्यात पंचगंगा नदीचा मोठा वाटा आहे. पंचगंगा नदीच्या पाण्याचा उपयोग शेतीसाठी करून घेतला आहे. शिवाय कोल्हापूर भागात विविध उद्योगांचा विकासही झालेला आहे. या नदीमुळे या भागातील प्रदेश सुजलाम् सुफलाम् बनला आहे. म्हणून पंचगंगा नदीला कोल्हापूर जिल्ह्याची 'भाग्यविधाती' आणि 'वरदायिनी' असे म्हटले जाते.



## 3. गोदावरी Godavari

**महाराष्ट्रातील** काही प्रमुख नद्यांमध्ये गोदावरी नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** नाशिकजवळ त्र्यंबकेश्वर येथे ब्रह्मगिरी पर्वतात




रामकुंड नाशिक

गोदावरी नदीचा उगम होतो.

**गोदावरी नदीच्या उपनद्या :** मांजरा, प्राणहिता, प्रवरा, सिंदफणा, दुधना, दारणा, कादवा, पूर्णा या गोदावरी नदीच्या उपनद्या आहेत. या नद्या गोदावरी नदीला ठिकठिकाणी येऊन मिळतात.

**गोदावरी नदीचे खोरे :** गोदावरी नदीच्या खोऱ्यामध्ये नाशिक, नगर, औरंगाबाद, नांदेड इत्यादी जिल्हे येतात.

**इतर माहिती :** गोदावरी नदी ही दक्षिण भारतातील एक पवित्र आणि प्रमुख नदी आहे. ही नदी नाशिक परिसरातून व मराठवाड्यातून वाहत पुढे आंध्र प्रदेशात जाते. महाराष्ट्रामध्ये गोदावरी नदीची लांबी ६६८ किलोमीटर आहे.

त्र्यंबकेश्वर येथील ब्रह्मगिरी पर्वतात उगम पावणारी गोदावरी नदी नाशिकच्या पंचवटीला वळसा घालून पुढे जाते. नंतर नगर जिल्ह्यातून पुढे ती दक्षिणवाहिनी बनते. गोदावरी नदीच्या काठी अनेक गावांत शंकराची मंदिरे बांधलेली आहेत. पुढे गोदावरी नदी नांदेडकडे वाहत जाते.

उगमाच्या ठिकाणी गोदावरी नदीचे पात्र बरेच अरुंद असले तरी

तिला जसजशा उपनद्या येऊन मिळतात तसतसे तिचे पात्र बरेच रुंद होत जाते. गोदावरी नदीच्या काठी नाशिक, पैठण, ही तीर्थक्षेत्रे आहेत. तसेच नांदेड हे शहरही गोदावरी नदीच्या काठी आहे. नाशिक येथे गोदावरी नदीच्या काठी अनेक घाट बांधलेले आहेत.

गोदावरी नदीला नांदूर-मधमेश्वर येथे कादवा नदी येऊन मिळते. तेथे पक्ष्यांसाठी अभयारण्य निर्माण केले आहे. गोदावरी नदीवर पैठणजवळ जायकवाडी हे मोठे धरण बांधले आहे. या धरणापासून कालवे काढून मराठवाड्यातील शेतीसाठी पाणीपुरवठा केला जातो. तसेच नाशिक, नगर, नांदेड, औरंगाबाद, बीड, परभणी या भागांत या धरणातील पाणी पिण्यासाठी पुरवले जाते.

गोदावरी नदीच्या खोऱ्यातील जमीन सुपीक बनली आहे. त्यामुळे या खोऱ्यात विविध प्रकारची पिके घेतली जातात. गोदावरी नदीला 'महाराष्ट्राची वरदायिनी' तसेच 'दक्षिण भारताची गंगा' असे म्हणतात.

**धरणे :** गोदावरी नदीवर गंगापूर, दारणा, भंडारदरा, येलदरी, सिद्धेश्वर, मन्याड, जायकवाडी इत्यादी धरणे बांधलेली आहेत.



---

## 4. वैतरणा Vaitarana

महाराष्ट्राच्या कोकण विभागातील प्रमुख नद्यांमध्ये वैतरणा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** वैतरणा नदीचा उगम त्र्यंबकेश्वरजवळ होतो. ही नदी पश्चिमेकडे वळून कोकणातून अरबी समुद्राला जाऊन मिळते.

**वैतरणा नदीच्या उपनद्या :** सूर्या व तानसा या वैतरणा नदीच्या उपनद्या आहेत.

**वैतरणा नदीचे खोरे :** वैतरणा नदीच्या खोऱ्यांमध्ये कोकण विभागाचा समावेश होतो.

**इतर माहिती :** त्र्यंबकेश्वरजवळ उगम पावणारी वैतरणा ही नदी कोकणातील एक महत्त्वाची नदी मानली जाते. पावसाळ्यात पडणाऱ्या भरपूर पावसामुळे ही नदी दुथडी भरून वाहते. या नदीला सूर्या आणि तानसा या उपनद्या मिळतात. या वैतरणा नदीची लांबी

बरीच कमी आहे. उन्हाळ्यात मात्र ही नदी कधी-कधी कोरडी पडते. वैतरणा नदीचे पाणी अडविण्यासाठी धरण अथवा बंधारा बांधलेला नाही. परिणामी या नदीचे पाणी अरबी समुद्राला जाऊन मिळते. या नदीतील पाण्याचा उपयोग कोकणातील काही भागाला पाणीपुरवठा करण्यासाठी होतो. ही नदी अरबी समुद्राला जिथे जाऊन मिळते तेथे खाड्या निर्माण झाल्या आहेत. वैतरणा नदीमुळे कोकणाच्या वैभवात बरीच भर पडली आहे. या नदीमुळे कोकण विभागातील लोकजीवन समृद्ध बनले आहे. त्यामुळे वैतरणा नदी कोकण विभागासाठी वरदान ठरलेली दिसते.



## 5. कोयना Koyna

महाराष्ट्राच्या कोकण विभागातील प्रमुख नद्यांमध्ये कोयना नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** सह्याद्री पर्वताच्या पश्चिम उतारावर महाबळेश्वर येथे ४००० फूट उंचीवर कोयना नदीचा उगम होतो.

**कोयना नदीच्या उपनद्या :** सोळशी, कांदाही, केरा, मोरणा आणि



कोयना धरण

रांगा या कोयना नदीच्या उपनद्या आहेत. या नद्या कोयना नदीला ठिकठिकाणी मिळतात.

**कोयना नदीचे खोरे :** कोयना नदीच्या खोऱ्यामध्ये सातारा, रत्नागिरी इत्यादी जिल्हे येतात. तसेच बामणोली डोंगर व वासोटा किल्ला यांच्या परिसरातील प्रदेश कोयनेच्या खोऱ्यात येतो.

**इतर माहिती :** महाबळेश्वर येथे उगम पावताना कोयना नदीचा आकार बराच रुंद आहे. प्रारंभी दक्षिणेकडे वाहणारी ही नदी हेळवाक या गावाजवळ पूर्ववाहिनी बनते. पुढे कऱ्हाडजवळ ती कृष्णा नदीला जाऊन मिळत्ते. म्हणजे कृष्णा आणि कोयना या नद्यांचा संगम कऱ्हाड जवळ होतो. या संगमाला 'प्रीती संगम' असे म्हणतात. उगमापासून कृष्णा नदीला मिळेपर्यंत कोयना नदीची लांबी सुमारे १०० किमी. आहे.

महाबळेश्वर येथे उगम पावणारी कोयना नदी जावळी आणि पाटण तालुक्यातून वाहत जाते. या नदीवर हेळवाक येथे एक मोठे धरण बांधले आहे. या धरणाला 'कोयना धरण' असे म्हणतात. या धरणातील प्रचंड जलाशयाला 'शिवसागर' असे नाव देण्यात आले आहे.या जलाशयातील पाणी पश्चिमेकडे वळवून सह्याद्रीच्या बोगद्यातून चिपळूणजवळच्या पोफळी येथील जलविद्युत केंद्रातील जमीनिवर

सोडले आहे. त्यामुळे मोठ्या प्रमाणात वीजनिर्मिती होते.

कोयना नदीवरील धरणामुळे महाराष्ट्राचे भाग्य उदयाला आले आहे. पोफळी येथील जलविद्युत केंद्रातून निर्माण होणाऱ्या विजेवर मोठमोठे उद्योगधंदे चालतात. पश्चिम महाराष्ट्राला या वीजप्रकल्पातून वीजपुरवठा केला जातो. त्यामुळे कोयनेला 'महाराष्ट्राची भाग्यलक्ष्मी' असे म्हणतात. या वीजप्रकल्पातून निर्माण होणारी वीज घरगुती वापराप्रमाणेच शेती, उद्योग, कारखाने, व्यवसाय यासाठीही वापरली जाते. त्यामुळे महाराष्ट्राच्या भरभराटीत या वीजकेंद्राचा सिंहाचा वाटा आहे.



## 6. वैनगंगा Vainganga

महाराष्ट्रातील काही प्रमुख नद्यांमध्ये वैनगंगा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** वैनगंगा नदी मध्यप्रदेशातील सातपुडा पर्वतरांगांतील छिंदवाडा येथे उगम पावते. नंतर ही नदी महाराष्ट्राच्या विदर्भ भागात येते.

**वैनगंगा नदीच्या उपनद्या :** बावनथरी, कन्हान, चुलबन या वैनगंगा नदीच्या उपनद्या आहेत. या नद्या वैनगंगा नदीला ठिकठिकाणी येऊन मिळतात.

**वैनगंगा नदीचे खोरे :** वैनगंगा नदी महाराष्ट्राच्या विदर्भ विभागातून वाहते. वैनगंगा नदीच्या खोऱ्यामध्ये भंडारा, गडचिरोली व चंद्रपूर हे जिल्हे येतात.

**वैनगंगा नदीच्या खोऱ्यातील तलाव :** नवेगाव, शिवनी, घोडाझरी, असोलमेंढा, चोरखमारा तसेच बांदलकसा हे मोठे तलाव वैनगंगा नदीच्या खोऱ्यात आहेत.

**राष्ट्रीय उद्याने :** वैनगंगा नदीच्या खोऱ्यात नवेगाव व ताडोबा ही राष्ट्रीय उद्याने आहेत.

**इतर माहिती :** मध्य प्रदेशातील सातपुडा पर्वतरांगांत छिंदवाडा येथे उगम पावलेली वैनगंगा नदी दक्षिणवाहिनी बनते. भंडारा जिल्ह्यात तिला बावनथरी ही नदी येऊन मिळते. पुढे नागपूर जिल्ह्यातून येणारी कन्हान ही उपनदी मिळते. अंभोरा येथे वैनगंगा, कन्हान व आंब या नद्यांचा त्रिवेणी संगम होतो.

त्रिवेणी संगमानंतर वैनगंगेला वर्धा नदी येऊन मिळते. नंतर वैनगंगा नदीला 'प्राणहिता नदी' म्हणतात. वैनगंगेच्या खोऱ्यात भंडारा, गडचिरोली व चंद्रपूर हे जिल्हे येतात. या भागात गोंड आदिवासी लोक मोठ्या प्रमाणावर राहतात. या आदिवासींसाठी वैनगंगा नदी विशेष महत्त्वाची आहे; कारण त्यांचे जीवन या वैनगंगा नदीमुळे सुसह्य झाले आहे. वैनगंगा नदीच्या पाण्याचा उपयोग विविध गावांना होतो. विदर्भ विभाग वैनगंगा नदीवर मोठ्या प्रमाणावर अवलंबून आहे. वैनगंगा नदीमुळे तिच्या आसपासचा प्रदेश सुपीक बनला आहे. या नदीच्या पाण्याचा उपयोग विविध कारणांसाठी करून घेतला जातो. वैनगंगा नदीवर यवतमाळ जिल्ह्यात उमरखेड जवळ 'सहस्रकुंड' नावाचा मोठा धबधबा आहे.



## 7. इंद्रायणी Indrayani

महाराष्ट्रातील पवित्र नद्यांमध्ये इंद्रायणी नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** नाणे मावळात सह्याद्रीच्या डोंगररांगांत कुरवंडे या



आळंदी

गावाजवळ इंद्रायणी नदी उगम पावते.

**इंद्रायणी नदीच्या उपनद्या :** कुंडलिका व आंद्रा या इंद्रायणी नदीच्या उपनद्या आहेत. याशिवाय इतर काही छोट्या-छोट्या उपनद्या इंद्रायणीला येऊन मिळतात.

**इंद्रायणी नदीचे खोरे :** पुणे जिल्ह्यातील मावळ, राजगुरुनगर, हवेली हे तालुके इंद्रायणी नदीच्या खोऱ्यात येतात.

**इतर माहिती :** आळंदी आणि देहू ही तीर्थक्षेत्रे इंद्रायणी नदीच्या काठी आहेत. इंद्रायणीच्या उगमापासून जवळच लोणावळा हे थंड हवेचे ठिकाण आहे. उगमापासून इंद्रायणी नदीचे पात्र अरुंद आणि उथळ आहे. प्रारंभी दक्षिणीवाहिनी असणारी ही नदी लगेच दक्षिणपूर्वेकडे वळते. पुढे कुंडलिक आणि आंद्रा या नद्या इंद्रायणीला मिळतात. इंद्रायणी पूर्वेकडे देहू जवळून वाहत पुढे आळंदी येथे येते. पुढे उत्तरेकडे वळून ती तुळापूर गावाजवळ भीमा नदीला मिळते.

इंद्रायणी नदीची लांबी तसेच तिचे पाणलोट क्षेत्र बरेच लहान आहे. इंद्रायणी नदीला पावसाळ्यात भरपूर पाणी असले तरी उन्हाळ्यात मात्र पाण्याचे प्रमाण फारच कमी होते. या नदीच्या खोऱ्यातील जमीन काळी, कसदार, सुपीक व गाळाची आहे. इंद्रायणी नदीकाठचा प्रदेश

अत्यंत सुपीक आहे. या नदीकाठी आळंदी व देहू ही पवित्र तीर्थक्षेत्रे आहेत. इंद्रायणी नदीच्या पाण्याचा उपयोग आसपासच्या शेतीसाठी केला जातो. इंद्रायणी नदीमुळे पुणे जिल्ह्याचा मध्य भाग समृद्ध बनला आहे.



## 8. प्रवरा Pravara



महाराष्ट्रातील पवित्र नद्यांमध्ये प्रवरा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** सह्याद्रीच्या पूर्व उतारावर कळसूबाई शिखराजवळ रतनगड आणि कुलंगगड यांच्यादरम्यान सुमारे १००० मीटर उंचीवर प्रवरा नदीचा उगम होतो.

**प्रवरा नदीच्या उपनद्या :** अदुला, महाळुंगी, मारसिंग, गोरा आणि मुळा या प्रवरा नदीच्या उपनद्या आहेत. या नद्या ठिकठिकाणी प्रवरा नदीला येऊन मिळतात.

**प्रवरा नदीचे खोरे :** प्रवरा नदीच्या खोऱ्यात अहमदनगर हा जिल्हा आहे. खास करून या जिल्ह्यातील अकोले, संगमनेर, श्रीरामपूर, राहुरी, तसेच नेवासा हे तालुके प्रवरा नदीच्या खोऱ्याने समृद्ध बनले आहेत.

**इतर माहिती :** उगमापासून सुमारे १५० किमी. वाहत येऊन प्रवरा नदी नेवाशाजवळ गोदावरी नदीला येऊन मिळते. प्रवरा नदीच्या उगमाजवळ एक सुंदर शिवमंदिर आहे. प्रवरा नदीच्या पहिल्या टप्प्यात अकोले तालुक्यात भंडारदरा येथे एक धरण बांधले आहे. या धरणातील पाणी ओझर येथील बंधाऱ्यात अडवले आहे. येथून कालवे काढून शेतीसाठी पाणीपुरवठा केला जातो. हे पाणी संगमनेर, श्रीरामपूर, राहुरी तसेच नेवासे तालुक्यातील शेतीसाठी पुरविले जाते. त्यामुळे या भागात ऊस हे पीक मोठ्या प्रमाणात घेतले जाते. म्हणून अहमदनगर जिल्ह्यात बरेच साखर कारखाने निघाले आहेत. अहमदनगर जिल्ह्याची प्रगती करण्यात व या जिल्ह्यातील शेती सुजलाम् सुफलाम करण्यात प्रवरा नदीचा वाटा मोठा आहे. भंडारदरा येथील धरणातील पाणी शेतीप्रमाणेच पिण्यासाठी आणि उद्योग-व्यवसायासाठी मोठ्या प्रमाणात वापरले जाते. प्रवरा नदीच्या काठावर ठिकठिकाणी मंदिरे बांधलेली आहेत. हा सर्व विचार करता प्रवरा नदीला अहमदनगर जिल्ह्याची वरदायिनी असे म्हणतात.



## 9. कृष्णा Krishna



नरसोबाची वाडी


1. भीमा Bhima


2. पंचगंगा Panchganga


3. गोदावरी Godavari


4. वैतरणा Vaitarana


5. कोयना Koyna


6. वैनगंगा Vainganga


7. इंद्रायणी Indrayani


8. प्रवरा Pravara


9. कृष्णा Krishna






10. तापी Tapi


11. वर्धा Vardha


12. वारणा Warna


13. उल्हास Ulhas


14. मुळा Mula


15. मुठा Mutha


16. नीरा Nira


17. घोड Ghod


18. कऱ्हा Karaha

कृष्णा नदी ही महाराष्ट्राची एक महत्त्वाची आणि मोठी नदी आहे.

**उगमस्थान :** कृष्णा नदीचा उगम सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर येथे होतो.

**कृष्णा नदीच्या उपनद्या :** कोयना, वारणा, पंचगंगा, भीमा, येरळा या कृष्णा नदीच्या उपनद्या आहेत.

**इंद्रायणी नदीचे खोरे :** महाराष्ट्रातील सातारा आणि सांगली हे जिल्हे कृष्णा नदीच्या खोऱ्यात येतात.

**इतर माहिती :** कृष्णा नदी ही महाराष्ट्रातील एक मोठी नदी आहे. ही नदी महाबळेश्वर येथे उगम पावल्यावर सातारा व सांगली जिल्ह्यांतून कर्नाटक व आंध्र प्रदेशातून पुढे बंगालच्या उपसागराला मिळते.

प्रारंभी अरुंद असणारी ही नदी वाई या तीर्थक्षेत्राजवळ बरीच रुंद आणि संथ बनली आहे. कऱ्हाड या शहराजवळ कृष्णा व कोयना या नद्यांचा प्रीतिसंगम होतो. पुढे सांगलीजवळ कृष्णा नदीला वारणा नदी मिळते. तसेच कोल्हापूरजवळून वाहणारी पंचगंगा नदी कृष्णा नदीला नृहसिंहवाडीजवळ येऊन मिळते.

कृष्णा नदीच्या काठावर वाई, कऱ्हाड, सांगली ही प्रसिद्ध शहरे आहेत. कृष्णानदीला गावोगावी घाट बांधलेले आहेत. कृष्णा नदीच्या काठी असणाऱ्या गावांमध्ये अनेक मंदिरे बांधलेली आहेत.

कृष्णा नदीमुळे सातारा आणि सांगली जिल्ह्यांतील बरीच जमीन सुपीक बनली आहे. या जमिनीत विविध प्रकारची पिके घेतली जातात. कृष्णा नदी आणि तिच्या उपनद्यांचे पाणी सिंचनासाठी आणि उद्योग-व्यवसाय तसेच पिण्यासाठीही वापरले जाते. कृष्णा नदीमुळे सातारा आणि सांगली तसेच आसपासच्या प्रदेशाची औद्योगिक भरभराट झालेली आहे. त्यामुळे कृष्णा नदीला सातारा आणि सांगली जिल्ह्याची वरदायिनी असे म्हणतात.

महाराष्ट्रात सुमारे २८७०० चौ. किमी. क्षेत्रात कृष्णा नदीचे खोरे पसरलेले आहे. पूर्वेला शंभू महादेवाचे डोंगर व पश्चिमेला सह्याद्री पर्वत यांच्या दरम्यान कृष्णा नदीचे खोरे विस्तारलेले आहे. कृष्णा नदीच्या विविध उपनद्यांनी वाहून आणलेल्या गाळामुळे हे खोरे सुपीक बनले आहे.



# 10. तापी Tapi



बैतुल

महाराष्ट्रातील काही प्रमुख नद्यांमध्ये तापी नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** तापी नदी मध्यप्रदेशील बैतुल विभागात महादेवाच्या डोंगरात उगम पावते. तापी नदीच्या उगमाजवळ तिला 'मूळतापी' असे म्हणतात.

**तापी नदीचे खोरे :** तापी नदीच्या खोऱ्यामध्ये जळगाव जिल्ह्याचा मोठा प्रदेश येतो. अजिंठा डोंगररांगा, उत्तरेकडील सातपुडा पर्वत तसेच दक्षिणेकडील सातमाळा डोंगराच्या दरम्यानचा प्रदेश तापी नदीच्या खोऱ्यात येतो.

**तापी नदीच्या उपनद्या :** पूर्णा, पांझरा तसेच गिरणा या तापी नदीच्या प्रमुख उपनद्या आहेत. शिवाय इतर लहान उपनद्याही आहेत.

**इतर माहिती :** तापी नदी मध्य प्रदेश, महाराष्ट्र व गुजरात या तीन घटक-राज्यांतून वाहते. मध्य प्रदेशातील बुऱ्हाणपूरजवळून ती जळगाव जिल्ह्यात रावेरजवळ महाराष्ट्रात येते. येथे तिचा प्रवाह पूर्व-पश्चिम असा आहे. पुढे ती शहादा शहराजवळून गुजरातमध्ये प्रवेश करते.

तापी नदीची लांबी सुमारे ७०० किमी. असून त्यातील २०० किमी.

चा प्रवाह महाराष्ट्रात आहे. पूर्णा ही नदी जळगाव जिल्ह्यात तापी नदीला येऊन मिळते. तसेच पुढे पांझरा व गिरणा याही नद्या तापी नदीला येऊन मिळतात.

महाराष्ट्रात तापी नदीचे पात्र बरेच विशाल असून तिच्या काठावर काही तीर्थक्षेत्रे आहेत. तापी व पूर्णा यांच्या संगमाजवळ संत चांगदेवांची समाधी आहे. तापी नदीकाठी एदलाबाद येथे संत मुक्ताबाईंचे प्रसिद्ध मंदिर आहे.

तापी नदीच्या पाण्यामुळे तिच्या आसपासचा प्रदेश सुपीक बनला आहे. या नदीचे पाणी जलसिंचन, उद्योग-व्यवसाय तसेच पिण्यासाठी वापरले जाते. अमरावती, अकोला, जळगाव या भागातील आदिवासी लोकांचे जीवन तापी नदीवर मोठ्या प्रमाणात अवलंबून आहे. या विभागासाठी ही नदी वरदायिनी ठरली आहे.



## 11. वर्धा Vardha

महाराष्ट्रातील काही प्रमुख नद्यांमध्ये वर्धा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** वर्धा नदीचा उगम मध्य प्रदेशातील सातपुडा पर्वत-

रांगांच्या परिसरात मूलवाई या ठिकाणी होतो.

**वर्धा नदीच्या उपनद्या :** बेल, मांड चुडामन , यशोदा, वेण्णा तसेच बाकळी या वर्धा नदीच्या उपनद्या आहेत.

**वर्धा नदीचे खोरे :** चंद्रपूर जिल्ह्याचा व विदर्भाचा बराच भाग वर्धा नदीच्या खोऱ्यात येतो.

**इतर माहिती :** वर्धा नदीची लांबी सुमारे ४५० किमी. आहे. वर्धा नदी ही वैनगंगा नदीची उपनदी आहे. ही वर्धा नदी चंद्रपूर जिल्ह्यातील शिवनी या गावाजवळ वैनगंगेला मिळते. वर्धा नदीचे मूळ नाव 'वरदा' असे आहे. या नदीच्या काठी विदर्भ देशाची कौंडिण्यपूर ही प्राचीन राजधानी होती.

वर्धा नदी ही अमरावती व नागपूर या जिल्ह्यांजवळून वाहते. ती पुढे दक्षिणमुखी होते. बेल, मांड व चुडामन या उपनद्या तिला अमरावती जिल्ह्यात येऊन मिळतात. पुढे वर्धा जिल्ह्यातून वाहणाऱ्या यशोदा, वेण्णा व बाकळी या नद्या वर्धा नदीला मिळतात. पुढे वर्धा व वैनगंगा यांचा संगम होतो.

वर्धा नदी व तिला मिळणाऱ्या अनेक उपनद्या यामुळे वर्धा नदीचे खोरे बरेच विस्तीर्ण झाले आहे. वर्धा नदीचे खोरे विविध वनस्पतींनी समृद्ध बनले आहे. या भागात सागाची झाडे आहेत. वर्धा नदीच्या खोऱ्यात विविध प्रकारची खनिज संपत्ती सापडते. यामध्ये दगडी कोळसा व चुनखडी तसेच चिनीमातीचा समावेश आहे. बल्लारपूर येथील प्रसिद्ध कागद कारखाना वर्धा नदीच्या खोऱ्यातच आहे.

मध्य प्रदेशात उगम पावून महाराष्ट्रात येताना वर्धा नदी आपल्याबरोबर बराच गाळ वाहून आणते. त्यामुळे वर्धा नदीच्या खोऱ्यातील प्रदेश बराच सुपीक बनला आहे. त्यामुळे वर्धा नदीला 'विदर्भाची वरदायिनी' असे म्हणतात.



## 12. वारणा Warna

महाराष्ट्रातील काही प्रमुख नद्यांमध्ये वारणा नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** कऱ्हाडच्या पश्चिम बाजूला पांथरमुळा या पश्चिम

वारणा नदी

घाटावरील परिसरात वारणा नदी उगम पावते.

**वारणा नदीचे खोरे :** वारणा नदीचे खोरे विस्तीर्ण असून या नदीच्या खोऱ्यात कोल्हापूर व सांगली हे जिल्हे येतात.

**इतर माहिती :** वारणा नदी ही कृष्णा नदीची उपनदी असून ती दक्षिण महाराष्ट्रात महत्त्वाची नदी मानली जाते. उगमानंतर पुढे ही नदी दक्षिणमुखी बनते. पुढे ती धबधब्याच्या रूपात वाहते. जावळी व आंबोळे या गावाच्या उत्तर बाजूला कंदारडोह या खोल तळ्यात जाते.

कंदारडोहाजवळ या नदीच्या पात्रात बरेच दगडगोटे आढळतात. या भागात तिचे पात्र उथळ आहे; पण पुढे मात्र ते पात्र रुंद होते जाते. यानंतर वारणा नदी पूर्ववाहिनी बनते. पुढे ती सांगलीजवळ हरिपूर येथे कृष्णा नदीला मिळते.

वारणा नदीवर कोल्हापूर व सांगली जिल्ह्यांच्या सरहद्दीवर चांदोली येथे चांदोली हे धरण बांधण्यात आले आहे. या धरणातील पाणी जलसिंचनासाठी वापरले जाते. वारणा नदी सांगली व कोल्हापूर जिल्ह्याचा बराच भाग सुपीक बनला आहे. या धरणातील पाण्याचा उपयोग अनेक कारणांसाठी करून घेतला जातो.



❖❖❖❖

# 13. उल्हास Ulhas



कोकणातील काही प्रमुख नद्यांमध्ये उल्हास नदीचा समावेश आहे.

**उगमस्थान :** सह्याद्री पर्वतरांगांमधील बोरघाटात उल्हास नदी उगम पावते.

**उल्हास नदीच्या उपनद्या :** मुखाडी, भातसई व काळू या उल्हास नदीच्या उपनद्या आहेत.

**उल्हास नदीचे खोरे :** कोकणातील बराच भाग उल्हास नदीच्या खोऱ्यात येतो.

**इतर माहिती :** उल्हास नदीमुळे कोकणच्या वैभवात भर पडली आहे. उल्हास नदी ठाणे जिल्ह्यात आहे. बोरघाटात उगम पावणारी उल्हासनदी पश्चिमवाहिनी होते व ती पुढे अरबी समुद्राला जाऊन मिळते. उल्हास नदीची लांबी साधारणपणे १२५ ते १५० किमी. आहे. या नदीच्या मुखाशी वसई हे ऐतिहासिक शहर आहे. उल्हास नदीच्या

काठावर बरीच सुंदर मंदिरे आहेत.

उल्हास नदीचा उतार तीव्र आहे. या नदीवर ठाणे जिल्ह्यात धरण बांधले असून त्या धरणातील पाणी या जिल्ह्याच्या विकासासाठी वापरले आहे. उल्हास नदीच्या मुखाशी वसलेले वसई हे गाव केळीसाठी प्रसिद्ध आहे. उल्हास नदीमुळे ठाणे जिल्ह्यातील लोकांचे जीवन सुखी आणि समृद्ध बनले आहे. या नदीचे पात्र पावसाळ्यात दुथडी भरून वाहत असले तरी, तीव्र उतारामुळे उन्हाळ्यात तिच्या पाण्याचे प्रमाण बरेच कमी होते. या नदीच्या तीव्र उतारामुळे या नदीवर धरणे व बंधारे विशेष प्रमाणात बांधलेले नाहीत.



## पुणे जिल्ह्यातील नद्या

**भीमा नदी**

भीमा नदी ही महाराष्ट्रातील - पुणे जिल्ह्याची प्रमुख नदी आहे..

**भीमा नदीच्या प्रमुख उपनद्या :** मुळा, मुठा, नीरा इंद्रायणी व घोड या होत.

## 14. मुळा Mula



पुणे जिल्ह्यातील एक नदी. या नदीचा उगम सह्यांद्रीच्या पर्वतरांगेत होतो. तेथून ती पूर्व दिशेला वाहाते. मुळशी येथे या नदीवर बरेच जुने मूळशी धरण आहे. पुणे शहराच्या पूर्व बाजूस मुळेचा संगम मुठा नदीशी होतो. तुळापूर येथे या दोन्ही नद्या भीमा नदीला मिळते.

❖❖❖❖

## 15. मुठा Mutha



मुठा नदी पुणे जिल्ह्यातील एक नदी आहे. या नदीचा उगम सह्याद्रीच्या पर्वतरांगेत होतो. तेथून ती पूर्व दिशेला वाहते. खडकवासला व टेमघर ही दोन मोठी धरणे आहेत. हे. पुणे शहराला मुख्यत्वे पाणीपुरवठा खडकवासला व पानशेत या धरणातून होतो.

पुणे शहराच्या पूर्व बाजूस मुठेचा मुळा नदीशी संगम होतो. तुळापूर येथे या दोन्ही नद्या भीमा नदीला मिळतात.

❖❖❖❖

## 16. नीरा Nira



नीरा नदीचा उगम भोर तालुक्यातील हिरोढस-मावळ खोऱ्यातील शिरगाव येथून उगम पावते. पुणे जिल्ह्याच्या दक्षिण सीमेवरून वाहते. नीरा नदीच्या काठावर 'वीर म्हस्कोबा' हे तीर्थक्षेत्र आहे. पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहते. नीरा नदीवर -नीरा देवधर, वीर ही दोन धरणे आहेत. निरा नदीची उपनदी वळवंडी आहे. या वळवंडी नदीवर 'भाटघर' हे प्रसिद्ध धरण आहे.

**नीरा नदीच्या प्रमुख उपनद्या :** वेळवंडी, गुंजवणी, कऱ्हा,नीरा नदी पुढे नरसिंगपूरजवळ भीमा नदीस जाऊन मिळते. ❖❖❖❖

---

## 17. घोड Ghod

☆ आंबेगाव तालुक्यातील आहुपेगावी येथे घोड नदी उगम पावते.

★ घोडनदीच्या उपनद्या : कुकडी व मीना
★ पुणे जिल्ह्याच्या उत्तरेकडील भाग या नदीचे खोरे आहे.
★ घोड नदीकाठची ठिकाणे : घोडेगाव, शिरूर, वडगाव.



## 18. कऱ्हा Karaha

कऱ्हा नदी महाराष्ट्रातील एक उपनदी आहे. ही नीरा नदीची उपनदी आहे. ही पूर्व दिशेला वाहते. कऱ्हेचा उगम पुणे जिल्ह्यातील पुरंदर तालुक्यातील गराडी गावापासून झाला आहे. तिच्या काठावर जिल्ह्यातील सासवड आणि बारामती ही दोन गावे आहेत.



कऱ्हा नदी पुणे जिल्ह्याच्या बारामती तालुक्यात नीरा नदीला मिळते.



## पुणे जिल्ह्यातील धरणे

| धरणे | नदी |
|---|---|
| १) भाटघर | वेळवंडी |
| २) पानशेत | अंबी नदी |
| ३) वरसगाव | मोशी नदी |
| ४) खडकवासला | अंबी, मुशी व मुठा |
| ५) मुळशी | मुळा |
| ६) पवना | पवना |
| ७) चिंचणी | घोड |
| ८) येडगाव | माणिकडोह कुकडीनदी |
| ९) टेमघर | मुठा |



## जगातील सर्वात जास्त लांबीच्या नद्या

१) नाईल नदी (६,६९० कि. मी.)

२) ॲमेझॉन नदी (६,४५२ कि. मी.)

३) मिसिसिपी नदी-मिसुरी नदी (६,२७० कि. मी.)

४) यांगत्झे नदी (चँग चियांग) (६,२४५ कि. मी.)

५) येनिसे अंगारा नदी (५,५५० कि. मी.)

६) ह्यांग हो नदी (५,५६४ कि. मी.)

७) ऑब ईर्तीश नदी (५,४१० कि. मी.)

८) अमूर नदी (४,४१० कि. मी.)

९) काँगो नदी (४,३८० कि. मी.)

१०) लेना नदी (४,२६० कि. मी.)



## महाराष्ट्रातील नद्या

| नदी | उपनद्या |
|---|---|
| गोदावरी | पूर्णा, प्राणहिता, पैनगंगा, वर्धा, इंद्रावती, मांजरा, दुधना, पारणा, काडवा, सिंधफणा. |
| कृष्णा | कोयना, वारणा, पंचगंगा, भीमा, वेण्णा |
| भीमा | इंद्रायणी, मुळा, मुठा, नीरा, घोड, सीना, पवना, कुकडी, कऱ्हा. |
| तापी | पूर्णा, गिरणा, बोरी, अणेर, पांझरा |
| पूर्णा | काटेपूर्णा, नळगंगा |
| वैनगंगा | कऱ्हान, पैनगंगा, वर्धा |
| सिंधफणा | बिंदुसरा |
| मांजरा | तेरणा, कारंजा |



## महाराष्ट्राच्या नदीकाठी शहरे / गावे

| नदी | काठावरील शहरे / गावे |
|---|---|
| गोदावरी | नाशिक, नांदेड, पैठण, गंगाखेड, कोपरगाव, राक्षसभूवन. |
| भीमा (चंद्रभागा) | पंढरपूर |
| प्रवरा | नेवासे, संगमनेर |
| पंचगंगा | कोल्हापूर |
| नाग | नागपूर |
| इंद्रायणी | देहू, आळंदी |
| कृष्णा | वाई, कऱ्हाड, सांगली, मिरज, औदुंबर |
| मोर्णा | अकोला. |
| मुळा-मुठा | पुणे |
| पांझरा | धुळे |
| कयाधू | हिंगोली |
| धाम | पवनार |
| तापी | भुसावळ |



## संगमस्थाने

| नद्या | स्थान | जिल्हा |
|---|---|---|
| कृष्णा-पंचगंगा | नरसोबाची वाडी | कोल्हापूर |
| कृष्णा-कोयना | कराड | सातारा |
| मुळा-मुठा | पुणे | पुणे |
| कृष्णा-वेण्णा | माहुली | सातारा |
| कृष्णा-वारणा | हरिपूर | सांगली |
| गोदावरी-प्रवरा | नेवासे | अहमदनगर |



# महाराष्ट्रातील नद्या व प्रमुख धरणे

| नदी | धरण | जिल्हा |
|---|---|---|
| गोदावरी | जायकवाडी | औरंगाबाद |
| भोगावती | राधानगरी | कोल्हापूर |
| बाघ | सिरपूर | गोंदिया |
| गिरणा | चाणकपूर पांझण | नाशिक |
| पेंच | तीतलाडोह | नागपूर |
| गोदावरी | माजलगाव | बीड |
| मुठा | खडक-वासला | पुणे |
| वेळवंडी | भाटघर | पुणे |
| वेळवंडी | बिंदूसरा | बीड |
| कोयना | कोयना | सातारा |
| भीमा | उजनी | सोलापूर |
| नळगंगा | नळगंगा | बुलढाणा |
| दक्षिणा-पूर्णा | सिध्देश्वर | हिंगोली |
| खोबरागडी | तुलतुली | गड-चिरोली |

| नदी | धरण | जिल्हा |
|---|---|---|
| गोदावरी | गंगापूर | नाशिक |
| वैतरणा | मोडकसागर | ठाणे |
| गाढवी | इटियाडोह | गोंदिया |
| प्रवरा | भंडारदरा | अ. नगर |
| मुळा | मुळशी | पुणे |
| वारणा | वारणा | नाशिक |
| कृष्णा | धोम, योडशी | सातारा |
| अंबी | पानशेत | पुणे |
| दक्षिणा-पूर्व | येलदरी | हिंगोली |
| दिना | दिना | गडचिरोली |
| अडाण | अडाण | वाशिम |
| गोदावरी | माजलगाव | बीड |

